मौदा जिल्हा नागपूर येथील तहसिल कार्यालयाच्या इमारत बांधकामाच्या खर्चास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- बीएलडी २०१६/प्र. क्र.६८/ई-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १२ मार्च, २०२०.

संदर्भ:- १) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. बीएलडी-४९१०/प्र.क्र.१३/ई-८,दि.२३/०२/२०१०
२) विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर यांचे पत्र क्र. साप्रशा/कार्या-५(१)/कावि-१३/२०१६, दि.१७/०१/२०१६.

प्रस्तावना:-

मौदा जिल्हा नागपूर येथील तहसिल कार्यालयाच्या इमारत बांधकामाच्या रु.३९१.९६ लाख इतक्या रकमेच्या अंदाजपत्रक व नकाशास उपरोक्त संदर्भ क्र १ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. आता विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर यांनी संदर्भ क्र. २ येथील दि.१७/१/२०१६ च्या पत्रान्वये सदर इमारतीच्या कामामध्ये मुळ संकल्पचित्रामधील बदल, भाववाढ, काम करतांना गरजेनुसार उद्भवलेल्या अतिरिक्त बाबी, निविदेमधील काही बाबींच्या परीमाणात झालेली वाढ इ. कारणामुळे झालेल्या रकमेच्या वाढीचा समावेश करुन रु.४५९.३८ लाख इतक्या खर्चाच्या बांधकामाच्या अंदाजपत्रकांस सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. सदर प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

मौदा जिल्हा नागपूर येथील तहसिल कार्यालयाच्या इमारत बांधकामाचे अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर यांनी उस्मानाबाद यांची तांत्रिक मान्यता प्राप्त असलेले सुधारित अंदाजपत्रक सन २००८-०९ च्या दर सुचीवर आधारित आहे. या अंदाजपत्रकांची सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी तपासणी केली असून, त्यास अनुलक्षून सोबतच्या सहपत्र 'अ' अनुसार रु. ४,५९,३७,८०१/- लाख (रुपये चार कोटी एकोणसाठ लाख सदोतीस हजार आठशे एक फक्त) च्या खर्चास शासन सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करीत आहे.

२. प्रस्तावित बांधकामावरील पुर्वी दिलेल्या आर्थिक अनुदानाची रक्कम वगळून अधिकचा खर्च लेखाशिर्ष "मागणी क्रमांक एच-८ ४०५९ - सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च ०१ कार्यालयीन इमारती ०५१, बांधकाम (०७) जिल्हा प्रशासन (योजनांतर्गत) ५३, मोठी बांधकामे (०७)(०१) मोठी बांधकामे

(४०५९ ०७९९) (०७) (०२) आस्थापना खर्च (४०५९ ०८०५) (०७)(०३) हत्यारे व संयंत्र यांचा खर्च (४०५९ ०८१४)" या उद्दिष्टाखालील अर्थसंकल्पीय अनुदानामधून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभागाने त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र. सं.क्र.३/इमा-३ दि.०३/०१/२०१८ व वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१६७/व्यय-९/२०१९, दि.२२/०४/२०१९ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार तसेच वित्त विभागाचे पत्र क्र. व्यअस-२०१९/प्र.क्र.३७/अर्थ-२, दि. ३० ऑगस्ट, २०१९ सोबतच्या कार्यवृत्तानुसार दि.२० ऑगस्ट, २०१९ रोजीच्या बैठकीत व्यय अग्रक्रम समितीने दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२००३१२१७४३३०३६१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

AJIT SOPANRAO DESHMUKH

Digitally signed by AJIT SOPANRAO DESHMUKH
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=3d2bd4ed83b4c722151f75f40dad09e69527159e04d26476bbf5363e7b1c3cb2, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=704cb545c50221b15cde7ccb8854e694c765dfb3a0240e891ebfb56ee79e3440, ou=REVENUE, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=AJIT SOPANRAO DESHMUKH
Date: 2020.03.12 17:47:03 +05'30'

**( अजित देशमुख )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर.
२. जिल्हाधिकारी, नागपूर.
३. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
४. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर.
५. तहसीलदार, मौदा, जि.नागपूर.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा -नागपूर
७. उप सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-३), मंत्रालय, मुंबई-३२.
८. उप सचिव, वित्त विभाग, कार्यासन- व्यय-९, मंत्रालय, मुंबई-३२.
९. निवड नस्ती.

(शासन निर्णय क्र. बीएलडी-२०१६/प्र.क्र.६८/ई-८, दि. १२ मार्च, २०२० चे सहपत्र)

"सहपत्र-अ"

Name of Work: Revised Estimate of Construction of Administration Building for Tahasil office at Mauda in Nagpur District

**RECAPITULATION SHEET**

| Sr. No. | Particulars | Amount |
|---|---|---|
| 1) | Cost as per Execution (Civil) | 4,06,62,402.00 |
| 2) | Cost of Balance work (Civil) | 0.00 |
| 3) | Cost of Internal Electrification | 12,65,570.00 |
| | | - |
| | Total<br>Less 0.10% as per agreement | 4,19,27,972.00<br>-4022.00 |
| | Net amount | 4,19,23,950.00 |
| 4) | Cost of Price Escalation (paid) | 21,78,531.00 |
| 5) | Add for Price Escalation (to be paid) | 0.00 |
| 6) | Add for External Electrification (Balance in AA estt.) | 18,35,320.00 |
| 7 ) | Add for Contigencies (0%)on Rs. 41931996.00 | 0.00 |
| | **Total Rs.** | **4,59,37,801.00** |

**Say Rs. 459.38 lakh**